**<u>अनुदान वाटप</u>**
**जिल्हा परिषद व पंचायत समिती सार्वत्रिक निवडणुकांच्या कार्यालयीन खर्चासाठी अनुदान उपलब्ध करुन देण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
**शासन निर्णय क्रमांकः** जिपनी-२०१६/प्र.क्र.७०/पंरा-२
बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई-४०० ००१
तारीख: ९ फेब्रुवारी, २०१७.

**संदर्भ :-**
१. या कार्यालयाकडील शासन निर्णय क्रमांक जिपनी-२०१५/प्र.क्र.४९/पं.रा.२, दिनांक २ नोव्हेंबर २०१५.
२. या कार्यालयाकडील शासन निर्णय समक्रमांक, दिनांक २६ ऑक्टोंबर २०१६, दिनांक २४ जानेवारी २०१७.
३. राज्य निवडणुक आयोगाचे पत्र क्रमांक रानिआ/जिपपंस-२०१६/ प्र.क्र.५१/ कार्या-७, दिनांक ११ जानेवारी २०१७.
४. राज्य निवडणुक आयोगाचे पत्र क्रमांक रानिआ/जिपपंस-२०१६/ प्र.क्र.२५/ कार्या-७, दिनांक ७ फेब्रुवारी २०१७.

**<u>प्रस्तावना :-</u>**

राज्यातील २५ जिल्हा परिषदा व त्याअंतर्गत येणा-या २८३ पंचायत समित्यांच्या सार्वत्रिक निवडणुकांचा कार्यक्रम राज्य निवडणुक आयोगाने दिनांक ११ जानेवारी २०१७ रोजी जाहीर केलेला आहे.

राज्य निवडणुक आयोगाने जाहीर केलेल्या कार्यक्रमानुसार जिल्हा परिषद व पंचायत समित्यांच्या सार्वत्रिक निवडणुकांसाठी येणा-या कार्यालयीन खर्चामध्ये जसे की, निवडणुकांसाठी स्टेशनरी (मतपत्रिका व नमुने छपाई यासह), सर्व प्रकारचे निवडणुक साहित्य, ई.व्ही.एम मशिन देखभाल व दुरुस्ती खर्च, जाहिरात खर्च, सर्व प्रकारची वाहतुक व इंधन खर्च, निवडणुक कामासाठी अधिग्रहीत केलेल्या वाहनांचे भाडे, ई.व्ही.एम मशिन चे ने-आण करण्यासाठी होणारा खर्च निवडणुक प्रशिक्षणासाठी/मतदानासाठी/मतमोजणीसाठी भाडयाने घेतलेले हॉल आणि मंडप/खाजगी आस्थापना

यांचे भाडे, सदर प्रयोजनासाठी भाडयाने घेतलेले फर्निचर साहित्य यांचे भाडे, संगणक व्यवस्था, दुरध्वनी संबंधित अनुषंगिक खर्च, विज व जनरेटर व्यवस्थेवरील खर्च, मतदार जागृती अभियानावरील खर्च, छायाचित्रण व व्हिडीओग्राफी यावरील खर्च, मतदार केंद्रावर आवश्यक सोयी सुविधांसाठी आवश्यक असलेला अनुषंगिक खर्च तसेच प्रत्यक्ष निवडणुक कामासाठी नियुक्त केलेल्या अधिकारी/कर्मचारी आणि पोलीस कर्मचारी यांचे मानधन त्याचबरोबर निवडणुकांच्या अनुषंगाने आवश्यक असणा-या इतर बाबींवरील खर्चाचा समावेश असून त्यासाठी दिनांक २६ ऑक्टोंबर २०१६ अन्वये रुपये ३,९०,००,०००/- व दिनांक २४ जानेवारी २०१७ च्या शासन निर्णयान्वये रुपये ११४,३०,८७,३००/- इतके अनुदान उपलब्ध करुन देण्यात आलेले आहे.

## शासन निर्णय :-

राज्य निवडणूक आयोगाने संदर्भाकिंत क्रमांक ४ येथील पत्रान्वये राज्यातील जिल्हा परिषदा व त्याअंतर्गत पंचायत समित्यांच्या निवडणूकांसाठी जिल्हानिहाय अंतिम मतदार यादी उपलब्ध करुन दिली आहे. त्याअनुषंगाने दिनांक १४ जून २०१६ च्या शासन निर्णयान्वये जिल्हा परिषद व पंचायत समित्यांच्या सार्वत्रिक निवडणुकांच्या कार्यालयीन खर्चासाठी ठरविण्यात आलेल्या रुपये ४०/- प्रति मतदार याप्रमाणे उर्वरीत रुपये ३४,८२,२६,२२०/- ( रुपये चौतीस कोटी ब्याऐशी लक्ष सव्वीस हजार दोनशे वीस मात्र ) इतका निधी वितरीत करण्यात येत आहे.

लेखाशिर्ष - मागणी क्र.एल-२, २०५३ जिल्हा प्रशासन, (०२) जिल्हा परिषदा व पंचायत समित्या यांच्या निवडणुकांबाबतचा खर्च, (०२) (०१) जिल्हा परिषदा व पंचायत समित्या यांच्या निवडणूकाबाबतचा खर्च, (२०५३ ०५२९) दत्तमत (योजनेतर) (राज्यक्षेत्र)" या लेखाशीर्षाखाली सन २०१६-१७ साठी मंजुर करण्यात आलेल्या आर्थिक तरतुदी मधुन, जिल्हा परिषद व पंचायत समित्यांच्या सार्वत्रिक निवडणुकांच्या कार्यालयीन खर्चासाठी सोबत जोडलेल्या विवरणपत्रात दर्शविल्यानुसार निधी संबंधित जिल्हाधिकारी यांच्याकडे खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून सुपूर्द करण्यात येत आहे.

(अ) या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेले अनुदान हे शासनाने वेळोवेळी निश्चित केलेल्या अटी व शर्तींच्या अधीन आहे.

(ब) या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेले अनुदान हे जिल्हा परिषद व पंचायत समिती सार्वत्रिक निवडणुकांसाठी कार्यालयीन खर्चासाठी वापरण्यात यावे. याकामी कोणतीही अनियमितता होणार नाही व अनावश्यक खर्च होणार नाही याची काळजी विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी यांनी घ्यावी.

(क) मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही आणि कोणतीही अनियमितता घडणार नाही, याची दक्षता विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी यांनी घ्यावी व शिल्लक रक्कम दि.३१.३.२०१७ पुर्वी समर्पित करावी.

(ड) या अनुदानातून होणाऱ्या खर्चाची विवरणपत्रे विभागीय आयुक्त यांनी राज्य निवडणूक आयोग व शासनाकडे पुढील १५ तारखेपूर्वी सादर करावीत, खर्चावर नियंत्रण ठेवण्याची जबाबदारी विभागीय आयुक्त यांची राहील.

(इ) सदर अनुदान अर्थसंकल्प वितरण प्रणालीनुसार (B.D.S) जिल्हाधिकारी यांचा (युजर आयडी क्रमांक ००९३०), उप जिल्हा निवडणूक अधिकारी (युजर आयडी क्रमांक ०००९३४), जिल्हाधिकारी यांचे प्रमुख लिपिक (युजर आयडी क्रमांक ०००९४८) यांच्या युजर आयडीवर वितरीत करण्यात येत आहे.

(ई) उपरोक्त प्रयोजनार्थ होणारा खर्च हा मागणी क्र.एल-२, २०५३ जिल्हा प्रशासन, (०२) जिल्हा परिषदा व पंचायत समित्या यांच्या निवडणुकांबाबतचा खर्च, (०२) (०१) जिल्हा परिषदा व पंचायत समित्या यांच्या निवडणूकाबाबतचा खर्च, (२०५३ ०५२९) दत्तमत (योजनेतर) (राज्यक्षेत्र)" या लेखाशीर्षाखालील सन २०१६-२०१७ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२०९१६०१५१२७२०, असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay R Bankar

Digitally signed by Sanjay R Bankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, cn=Sanjay R Bankar
Date: 2017.02.09 17:20:55 +05'30'

**संजय बनकर**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. सचिव, राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई-३२.

२) मा.विभागीय आयुक्त, कोकण, नाशिक, औरंगाबाद, पुणे, अमरावती, नागपुर.

३) मा.जिल्हाधिकारी, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, नाशिक, जळगाव, अहमदनगर, पुणे, सातारा, सांगली, सोलापूर, कोल्हापूर, औरंगाबाद, जालना, परभणी, हिंगोली, बीड, नांदेड, उस्मानाबाद, लातुर, अमरावती, बुलडाणा, यवतमाळ, वर्धा, चंद्रपुर, गडचिरोली.

४) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई, नागपूर.

५) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व परिक्षण) मुंबई, नागपूर.

६) जिल्हा लेखा कोषागार अधिकारी, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, नाशिक, जळगाव, अहमदनगर, पुणे, सातारा, सांगली, सोलापूर, कोल्हापूर, औरंगाबाद, जालना, परभणी, हिंगोली, बीड, नांदेड, उस्मानाबाद, लातुर, अमरावती, बुलडाणा, यवतमाळ, वर्धा, चंद्रपुर, गडचिरोली.

७) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई (दोन प्रती).

८) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, कार्यासन क्रमांक वित्त-१, वित्त-७ व वित्त-८.

९) वित्त विभाग/ (अर्थसंकल्प-३, १६ व व्यय-१५), मंत्रालय, मुंबई.

१०) निवडनस्ती.

**शासन निर्णय क्रमांक: जिपनी-२०१६/प्र.क्र.७०/पंरा-२, दि. ९ फेब्रुवारी, २०१७ चे विवरणपत्र**

| अ.क्र. | विभाग | जिल्हा | मतदार संख्या | रुपये ४०/- प्रति मतदार याप्रमाणे उपलब्ध करुन दयावयाचे एकुण अनुदान | दि.२६.१०.२०१६ व दि.२४.१.२०१७ च्या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेले अनुदान | दि. ९.२.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात येत असलेले अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | **कोकण** | रायगड | १४,६७,२३५ | ५,८६,८९,४००/- | ४,५५,०१,१५०/- | १,३१,८८,२५०/- |
| २ | | रत्नागिरी | १२,२१,५०८ | ४,८८,६०,३२०/- | ३,८१,१९,९५०/- | १,०७,४०,३७०/- |
| ३ | | सिंधुदुर्ग | ५,६३,६३१ | २,२५,४५,२४०/- | १,८५,२०,३२० /- | ४०,२४,९२०/- |
| ४ | **नाशिक** | नाशिक | २४,२७,०९४ | ९,७०,८३,७६०/- | ७,४३,१२,९४० /- | २,२७,७०,८२०/- |
| ५ | | जळगाव | २२,०४,१२० | ८,८१,६४,८००/- | ६,७६,३३,४७० /- | २,०५,३१,३३०/- |
| ६ | | अहमदनगर | २५,८३,७६३ | १०,३३,५०,५२०/- | ७,९०,१२,८९०/- | २,४३,३७,६३०/- |
| ७ | **पुणे** | पुणे | २८,४०,४७१ | ११,३६,१८,८४०/- | ८,६२,७१,७८०/- | २,७३,४७,०६०/- |
| ८ | | सातारा | १९,७६,६०१ | ७,९०,६४,०४०/- | ६,०८,२९,२९० /- | १,८२,३४,७५०/- |
| ९ | | सांगली | १६,०५,७४६ | ६,४२,२९,८४०/- | ४,९६,७०,७३० /- | १,४५,५९,११०/- |
| १० | | सोलापूर | २१,६७,८४९ | ८,६७,१३,९६०/- | ६,६३,२३,७९० /- | २,०३,९०,१७०/- |
| ११ | | कोल्हापूर | २१,५३,६६३ | ८,६१,४६,५२०/- | ६,६१,१०,१३०/- | २,००,३६,३९०/- |
| १२ | **औरंगाबाद** | औरंगाबाद | १५,८८,७३८ | ६,३५,४९,५२०/- | ४,७८,०५,६०० /- | १,५७,४३,९२०/- |
| १३ | | जालना | ११,१४,६७७ | ४,४५,८७,०८०/- | ३,४९,३०,१७०/- | ९६,५६,९१०/- |
| १४ | | परभणी | ९,०४,३७७ | ३,६१,७५,०८०/- | २,८६,२६,०३० /- | ७५,४९,०५०/- |
| १५ | | हिंगोली | ७,१७,५६७ | २,८७,०२,६८०/- | २,२६,४१,४५० /- | ६०,६१,२३०/- |
| १६ | | बीड | १५,५५,६२३ | ६,२२,२४,९२०/- | ४,६५,४६,५३०/- | १,५६,७८,३९०/- |
| १७ | **अमरावती** | नांदेड | १७,०२,३२७ | ६,८०,९३,०८०/- | ५,३३,२६,२३०/- | १,४७,६६,८५०/- |
| १८ | | उस्मानाबाद | १०,४५,५३६ | ४,१८,२१,४४०/- | ३,२८,६५,२४०/- | ८९,५६,२००/- |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| १९ | | लातुर | १३,११,१४५ | ५,२४,४५,८००/- | ४,०६,३५,७२०/- | १,१८,१०,०८०/- |
| २० | | अमरावती | १३,९२,२४० | ५,५६,८९,६००/- | ४,३२,३८,८५०/- | १,२४,५०,७५०/- |
| २१ | | बुलडाणा | १५,३२,८४८ | ६,१३,१३,९२०/- | ४,७४,८४,२७० /- | १,३८,२९,६५०/- |
| २२ | | यवतमाळ | १५,६८,१५२ | ६,२७,२६,०८०/- | ४,८४,८२,३१० /- | १,४२,४३,७७०/- |
| २३ | **नागपूर** | वर्धा | ७,७९,९९८ | ३,११,९९,९२०/- | २,४८,४१,७१० /- | ६३,५८,२१०/- |
| २४ | | चंद्रपुर | ११,९३,३८३ | ४,७७,३५,३२०/- | ३,७२,९८,९४० /- | १,०४,३६,३८०/- |
| २५ | | गडचिरोली | ६,०२,०४६ | २,४०,८१,८४०/- | १,९५,९७,८१०/- | ४५,२४,०३०/- |
| | | **एकुण** | ३,८२,२०,३३८ | १५२,८८,१३,५२० | ११८,०५,८७,३०० | ३४,८२,२६,२२० |

**(अक्षरी रक्कम रुपये चौतीस कोटी ब्याऐंशी लक्ष सव्वीस हजार दोनशे वीस मात्र)**

Sanjay R Bankar

Digitally signed by Sanjay R Bankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, cn=Sanjay R Bankar
Date: 2017.02.09 17:21:39 +05'30'

**(संजय बनकर)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**